**मराठी भाषा भवन मुख्य केंद्र या इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः मभाभ-२०२१/प्र.क्र.४८/भाषा-१,**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६ एप्रिल, २०२२.

**वाचा :**

१) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्रमांक : मभाभ-२०१६/प्र.क्र.१२८/भाषा-१,(भाग-२), दि.०५.०३.२०१९.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : जमीन-२५२०/२७४/प्र.क्र.२२/ज-२, दि.१२.०७.२०२१.
३) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाचे पत्र क्र. जा.क्र./का.अभि./वि.क्र.१/ठाणे/ए-९०१७६/२०२२, दि.१५.०३.२०२२.
४) कक्ष अधिकारी (इमा-१), सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे पत्र क्र. बैठक २०२२/प्र.क्र.२६/इमा-१, दि.०४.०४.२०२२.

**प्रस्तावना :**

"मराठी भाषा भवन" हा उपक्रम मराठी भाषा विभागाकडून हाती घेण्यात आला आहे. दि.१४.०२.२०१८ च्या मा. मंत्रिमंडळ बैठकीमध्ये मराठी भाषा भवनचे मुख्य केंद्र दक्षिण मुंबई किंवा वांद्रे-कुर्ला वसाहत या परिसरामध्ये व उपकेंद्र ऐरोली, नवी मुंबई येथे बांधण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यास अनुसरुन दि.०५.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यतेचे आदेश निर्गमित करण्यात आले.

२. मराठी भाषा भवन मुख्य केंद्र उभारणीकरीता विभागाने जवाहर बालभवन, चर्नी रोड, मुंबई येथील भूखंड क्र.१७३६, एकूण क्षेत्रफळ ३२१७.४२ चौ. मी. पैकी शालेय शिक्षण विभागाचे बांधकाम वगळून उर्वरित भूखंड विनामोबदला मराठी भाषा विभागास उपलब्ध करून देण्याचा निर्णय दि.२४.०३.२०२१ रोजीच्या मा.मंत्रिमंडळ बैठकीमध्ये घेण्यात आला. सदर मंत्रिमंडळ निर्णयाच्या अनुषंगाने महसूल व वन

विभागाने उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मराठी भाषा भवन मुख्य केंद्र उभारण्याकरीता गिरगाव महसूल विभागातील भूकर क्र.१७३६ एकूण क्षेत्रफळ ३२१७.४२ चौ.मी. या क्षेत्रापैकी शालेय शिक्षण विभागाचे बांधकाम वगळून उर्वरित १५५५ चौ.मी. क्षेत्रफळ तसेच याच मिळकतीमधील झोपडपट्टी अतिक्रमणाखाली असलेले ५५० चौ.मी. क्षेत्र (प्रत्यक्षात ५३० चौ.मी.) असे एकूण २१०५ चौ.मी. (प्रत्यक्षात २०८५ चौ.मी.) इतके क्षेत्र मराठी भाषा विभागास महसूल मुक्त व भोगवटा मुल्यरहित तत्त्वावर हस्तांतरित करण्यास मान्यता दिली आहे. सदर मान्यतेच्या अनुषंगाने मा. जिल्हाधिकारी, मुंबई शहर कार्यालयाने दि.१४.०७.२०२१ रोजीच्या ताबा पावतीन्वये सदर जागेचा ताबा मराठी भाषा विभागास दिला आहे.

३. उपरोक्त जागेवर मराठी भाषा भवन मुख्य केंद्र या इमारतीचे बांधकाम महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून करून घेण्याचा निर्णय मा.मंत्री, मराठी भाषा यांच्या अध्यक्षतेखाली दि.२०.०७.२०२१ रोजी पार पडलेल्या बैठकीत घेण्यात आला आहे. प्रस्तावित इमारतीचे बांधकाम आराखडे तयार करण्याकरीता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या स्तरावर स्पर्धा आयोजित करून वास्तूविशारदाची निवड करण्याबाबत शासनाच्या दि.२६.०७.२०२१ रोजीच्या पत्रान्वये महामंडळास कळविण्यात आले होते. त्यानुसार मराठी भाषा भवन मुख्य केंद्राचे आराखडे तयार करण्याकरीता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या स्तरावर स्पर्धा घेऊन सदर स्पर्धेतून दि.१०.०१.२०२२ रोजी महामंडळाच्या स्तरावर झालेल्या बैठकीत मे. पी.के.दास अँड असोसिएट्स, मुंबई यांची सर्वोच्च संयुक्त तांत्रिक व आर्थिक गुण प्राप्त केल्यामुळे वास्तूविशारद म्हणून निवड करण्यात आली. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांनी मे.पी.के.दास अँड असोसिएट्स, मुंबई यांना मराठी भाषा भवन मुख्य केंद्र या इमारतीच्या बांधकामाबाबतचा कार्यादेश दि.२८.०२.२०२२ रोजी दिला आहे.

त्यानुसार महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून संदर्भाधीन क्र. ३ येथील दि.१५.०३.२०२२ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झालेले मराठी भाषा भवन मुख्य केंद्र या इमारतीच्या

बांधकामाचे ढोबळ अंदाजपत्रक व बांधकाम आराखडे यांची शासन स्तरावर छाननी करून प्रस्तावित इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

मे.पी.के.दास अँड असोसिएट्स, मुंबई यांनी त्यांच्या दि.३१.०१.२०२२ रोजीच्या पत्रान्वये मराठी भाषा भवन मुख्य केंद्राच्या बांधकामाकरीता रू.१३२.६७ कोटी इतक्या रकमेचे ढोबळ अंदाजपत्रक महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास सादर केले होते. सदर ढोबळ अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यता देण्याकरीता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने त्यांच्या दि.१५.०३.२०२२ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केले आहे. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने सादर केलेल्या एकूण रू.१३२.६७ कोटी इतक्या ढोबळ अंदाजपत्रकाची शासन स्तरावर सार्वजनिक बांधकाम विभागाकडून छाननी करण्यात आली असून सार्वजनिक बांधकाम विभागाने सोबतच्या परिशिष्टात दर्शविल्यानुसार परिगणना करून रू.१२६.८९ कोटी (अक्षरी रूपये एकशे सव्वीस कोटी एकोणनव्वद लक्ष फक्त) इतक्या ढोबळ अंदाजपत्रकास सहमती दर्शविली आहे. तसेच सदर कामाची किंमत रू.१५.०० कोटी पेक्षा जास्त असल्याने मा.उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.२८.०३.२०२२ रोजी पार पडलेल्या बैठकीत याप्रकरणीचा प्रस्ताव सादर करण्यात आला. सदर समितीने चर्चेअंती मे. पी.के.दास ॲन्ड असोसिएटस, मुंबई यांनी सादर केलेली समर्थनीय कारणमीमांसा विचारात घेऊन अंदाजित रु.१२६.८९ कोटी इतक्या किंमतीच्या ढोबळ अंदाजपत्रकास सहमती दर्शविली आहे.

२. मराठी भाषा भवन मुख्य केंद्र या इमारतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे -

१. मराठी भाषा भवन मुख्य केंद्र प्रस्तावित इमारतीची रचना ही B+G+७ असून त्यांचे अंदाजे क्षेत्रफळ ६५८३ चौ.मी. आहे.
२. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक सादर करून तसेच सदर बांधकामास विहित कार्यपध्दतीने सविस्तर तांत्रिक मान्यता घेऊनच काम हाती घ्यावे.

३. प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घ्यावी.

४. तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक : २०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दि.११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

५. प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करून उद्योग,उर्जा व कामगार विभागाकडील दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात. तसेच सदर प्रक्रियेबाबत विभागास वेळोवेळी अवगत करण्यात यावे.

६. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही- २०१३/ प्र.क्र.१७७ /तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करून सदर कामे पूर्ण करावीत.

८. इमारतीमध्ये दिव्यांगाकरीता उपलब्ध करून द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

९. विषयांकित कामाकरीता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

१०. सदर कामाची सुरूवात सन २०२२-२३ या आर्थिक वर्षापासून होत आहे.

११. काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.

१२. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमा-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

१३. सदर प्रस्ताव सन २०२१-२२ च्या दरसूचीवर आधारित आहे.

१४. सदर कामाच्या अंदाजपत्रकास उपभोक्ता विभागाच्यावतीने सक्षम प्राधिकाऱ्याचे साक्षांकन आवश्यक आहे.

१५. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४०/इमा-३, दि.२५.०३.२०२२ व मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.२८.०३.२०२२ रोजी पार पडलेल्या बैठकीत प्रदान केलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच अन्वये महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदाखाली प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय

अधिकारातील अ.क्र.१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ समोरील तरतूदीन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. प्रस्तावित इमारतीच्या बांधकामाबाबत होणारा खर्च मागणी क्रमांक झेडएफ-४, मुख्य लेखाशीर्ष ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, (०१), कार्यालयीन इमारती, (०५१) बांधकाम, (००) (०१) मराठी भाषा संशोधन, विकास व सांस्कृतिक केंद्र स्थापन करणे (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे, (४०५९ २५३२) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध करून देण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४०६११४८४८१९३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND BHAGWAN GAWADE

Digitally signed by MILIND BHAGWAN GAWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d043e1f55c6ded344ffebea8801d8c286bfdcafaea54c716c9b31b47b87a9476, pseudonym=3FD721BE2B19DF245E0157FD3DC7B26475009465, serialNumber=EF777B84EAC7F675E3493144EF06F0FA1CB47DE2A32BE1156CA04D038F42D6E1, cn=MILIND BHAGWAN GAWADE
Date: 2022.04.06 12:36:42 +05'30'

**(मिलिंद भ.गवादे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१ मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल भवन, मुंबई
२ मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३ मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४ मा.मंत्री/मा.राज्यमंत्री, मराठी भाषा यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
५ सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६ मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, विधान भवन, मुंबई,
७ मा.अध्यक्ष/सदस्य, मराठी भाषा समिती, विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
८ मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,

९ महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
१० महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),नागपूर,
११ प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
१२ प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
१३ प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
१४ अपर मुख्य सचिव, वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई,
१५ अपर मुख्य सचिव, मराठी भाषा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१६ सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७ सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१८ मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मरोळ, अंधेरी (पूर्व), मुंबई,
१९ मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मरोळ, अंधेरी (पूर्व), मुंबई,
२० कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मरोळ, अंधेरी (पूर्व), मुंबई,
२१ कार्यकारी अभियंता, (ठाणे विभाग-१), महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, ठाणे.
२२ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२३ निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२४ सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२५ भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२६ सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई,
२७ संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
२८ सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
२९ निवड नस्ती (भाषा -१)

## परिशिष्ट

| शासन निर्णय क्र.मभाभ-२०२१/प्र.क्र.४८/भाषा-१, दि.०६.०४.२०२२ सोबतचे विवरणपत्र | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **Name of Department - Marathi Language Department** | | | | | |
| **Name of Work - Construction of Martahi Bhasha Bhavan, Charni Road, Mumbai** | | | | | |
| | | | | | |
| **RECAPITULATION SHEET** | | | | | |
| | | | | | |
| **Sr.No.** | **Particulars of Items** | **AREA IN SQM** | **Norms or Unit Rate per Sqmt** | **Cost Rs.** | **Cost in Crores** |
| | Area | 6583 | | | |
| | Number of floors | B+G+7 | | | |
| | | | | | |
| **1** | **Civil & Structural Works** | | | | |
| a | Foundation in Piling | | | 20035418 | 2.00 |
| b | Structural Works | 6583 | 29848.2897 | 196491291 | 19.65 |
| c | Architectural and civil works | 6583 | 5855.050 | 38543792 | 3.85 |
| d | Facad+Glazing | 6583 | 5744.385 | 37815284 | 3.78 |
| e | Jali | | | 80300000 | 8.03 |
| | | | **Sub Total (a)** | **373185785** | **37.32** |
| | | | | | |
| **2** | **M E P F Works** | | | | |
| a | Electrification | as per boq | | 29715428 | 2.97 |
| b | HVAC | as per boq | | 28701304 | 2.87 |
| c | Plumbing | as per boq | | 6969415 | 0.70 |
| d | Fire Fighting Services | as per boq | | 8101543 | 0.81 |
| e | Fire alarm system ,Public address system,CCTV | as per boq | | 4514105 | 0.45 |
| | | | **Sub Total (b)** | **78001795** | **7.80** |
| **3** | **Miscellaneous** | | | | |
| a | Facad Lighting | | | 4500000 | 0.45 |
| b | Elevator | as per quotation | | 5400000 | 0.54 |
| c | Interiors (Offices and common area) | as per boq | | 5,99,65,521 | 6.00 |
| d | Auditorium | as per boq | | 1,12,41,709 | 1.12 |
| e | Exhibition | as per quotation | | 26,51,33,395 | 26.51 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| f | Mechanical Parking | as per boq | | 2,79,99,972 | 2.80 |
| g | Infra | as per boq | | 63,22,217 | 0.63 |
| h | Roads | as per boq | | 75,51,948 | 0.76 |
| i | Compound wall | as per boq | | 24,17,720 | 0.24 |
| j | Gate | as per boq | | 3,27,458 | 0.03 |
| | | | **Sub Total (c )** | **39,08,59,940** | **39.09** |
| | | | **Total (a+b+c)** | **84,20,47,520** | 84.20 |
| | Add 5% Contingencies on (a+b+c) | | | | 4.21 |
| | Add 5% Escalation on (a+b+c) | | | | 4.21 |
| | **CONSTRUCTION COST TOTAL** | | | | **92.63** |
| | Add 3% ETP CHARGES | | | | 2.78 |
| | **PROJECT COST TOTAL** | | | | **95.40** |
| | Add 12% GST on Project Cost | | | | 11.45 |
| | Approvals | LS | | 14,00,00,000 | 14.00 |
| | **GRAND TOTAL** | | | | **120.85** |
| | Consultant fee at 4.8% on (94.18+14) | | | | 5.12 |
| | Add 18% GST on consultant fees | | | | 0.92 |
| | **GRAND PROJECT COST TOTAL** | | | | **126.89** |

*****